**इतर मागास बहुजन कल्याण विभागाच्या अधिपत्याखालील विजाभज प्रवर्गाच्या खाजगी अनुदानित आश्रमशाळा/ विद्यानिकेतन/ ऊसतोड कामगारांच्या मुलांसाठीच्या आश्रमशाळांमध्ये गणित व विज्ञान हे विषय ऐच्छिक स्वरुपात इंग्रजी माध्यमातून शिकविण्यास परवानगी देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**इतर मागास बहुजन कल्याण विभाग,**

**शासन निर्णय क्र.विभशा-२०२४/प्र.क्र.१२३/विजाभज-१**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

१ ला मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दि. १२ ऑगस्ट, २०२४

**संदर्भ:-**

१. शासन निर्णय, शालेय शिक्षण विभाग, क्र.सुआप्र-२००४/(८/०४)/प्राशि-४, दि.१०/०२/२००४

२. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र.सुआप्र-२००६/(१३६/०६)/प्राशि-५, दि.२२/११/२००७

३. शासन परिपत्रक, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र.सुआप्र-२००६/(१३६/०६)/प्राशि-५, दि.०६/०८/२००९

**प्रस्तावना:-**

राज्यात इतर मागास बहुजन कल्याण विभागांतर्गत विमुक्त जाती, भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्गातील विद्यार्थ्यांसाठी आणि ऊसतोड कामगारांच्या मुलांसाठी शासनमान्य खाजगी स्वयंसेवी संस्थांमार्फत अनुदान तत्वावर प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक आश्रमशाळा चालविण्यात येतात.

शालेय शिक्षण व क्रिडा विभागांतर्गत असलेल्या बिगर इंग्रजी माध्यमांच्या शाळांमध्ये गणित व विज्ञान विषय इंग्रजी माध्यमातून शिकविण्याबाबत वेळोवेळी मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या असून बिगर इंग्रजी माध्यमांच्या शाळांमध्ये गणित व विज्ञान विषय इंग्रजी माध्यमातून शिकविण्यास संदर्भ क्र.१ ते ३ अन्वये शालेय शिक्षण व क्रीडा विभागाकडून मान्यता दिलेली आहे.

इतर मागास बहुजन कल्याण विभागांतर्गत स्वयंसेवी संस्थामार्फत चालविण्यात येणाऱ्या खाजगी अनुदानित विजाभज निवासी आश्रमशाळेतील विद्यार्थीदेखील इतर शाळेतील विद्यार्थ्यांप्रमाणे स्पर्धेत टिकावेत याकरीता विजाभज आश्रमशाळांमध्ये सेमी इंग्रजी माध्यम सुरु करण्यास मान्यता देणेबाबत आश्रमशाळा संस्थाचालकांकडून विविध निवेदने / विनंती विभागाकडे प्राप्त झाली आहे. तसेच विजाभज आश्रमशाळांतील बिगर इंग्रजी माध्यमातील मुलांमध्ये इंग्रजी विषयाच्या ज्ञानाअभावी भविष्यात न्युनगंड निर्माण होऊ नये ही बाब विचारात घेवून राज्यात इतर मागास बहुजन कल्याण विभागांतर्गत विमुक्त जाती, भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्गातील विद्यार्थ्यांसाठी आणि ऊसतोड कामगारांच्या मुलांसाठी खाजगी स्वयंसेवी संस्थांमार्फत अनुदान तत्वावर चालविण्यात येणाऱ्या प्राथमिक व माध्यमिक आश्रमशाळा, ऊसतोड कामगारांच्या मुला-

मुलींसाठीच्या आश्रमशाळा व विद्यानिकेतन मध्ये गणित व विज्ञान विषय इंग्रजी माध्यमातून शिकविण्याच्या अनुषंगाने सेमी इंग्रजी माध्यमास परवानगी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यात इतर मागास बहुजन कल्याण विभागांतर्गत विमुक्त जाती, भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्गातील विद्यार्थ्यांसाठी आणि ऊसतोड कामगारांच्या मुलांसाठी शासनमान्य खाजगी स्वयंसेवी संस्थांमार्फत अनुदान तत्वावर चालविण्यात येणाऱ्या प्राथमिक व माध्यमिक आश्रमशाळेमध्ये इयत्ता ५ वी ते इयत्ता १० वीच्या वर्गांना गणित व विज्ञान हे विषय ऐच्छिक स्वरुपात इंग्रजी भाषेतून शिकविण्याच्या अनुषंगाने ज्या-ज्या संस्थांकडून विनंती प्राप्त होईल अशा संस्थांना खालील अटींच्या अधिन राहुन सेमी इंग्रजी माध्यमास मान्यता देण्याची कार्यवाही संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांनी तात्काळ करावी.

I. शैक्षणिक वर्ष सन २०२४-२५ पासून इयत्ता ५ वी व ८ वी या दोन वर्गांना गणित व विज्ञान हे विषय ऐच्छिक स्वरुपात इंग्रजी भाषेतून शिकविण्यास मान्यता द्यावी.

II. तद्नंतर शैक्षणिक वर्ष सन २०२५-२६ मध्ये इयत्ता ६ वी व ९ वी या वर्गांना व शैक्षणिक वर्ष सन २०२७-२८ मध्ये इयत्ता ७ वी व १० वी या वर्गांना नैसर्गिक रित्या गणित व विज्ञान हे विषय ऐच्छिक स्वरुपात इंग्रजी भाषेतून शिकविण्यास मान्यता द्यावी.

III. एखाद्या आश्रमशाळेने पुढील वर्षामध्ये इच्छुकता दाखविल्यास ५ वी, ६ वी, ७ वी किंवा ८ वी, ९ वी व १० वी या वर्गांना ३ वर्षामध्ये टप्पा-टप्प्याने मान्यता द्यावी.

IV. ज्या संस्थेच्या इच्छुकतेनुसार सेमी इंग्रजी अभ्यासक्रम लागु होईल अशा संस्थेस / आश्रमशाळेस सेमी इंग्रजी अभ्यासक्रमावर आधारित अध्यापन संबंधित आश्रमशाळेसाठी मंजूर शिक्षकांकडूनच करावयाचे आहे. त्यासाठी कोणताही नवीन अथवा ज्यादा शिक्षक किंवा अर्धवेळ शिक्षक अनुज्ञेय असणार नाही.

V. ज्या आश्रमशाळांना गणित व विज्ञान विषयासाठी ऐच्छिक सेमी इंग्रजी अध्यापन पद्धती स्विकारावयाची असेल, अशा आश्रमशाळेने सदर शिक्षणपद्धती / अभ्यासक्रम स्विकारल्यानंतर हीच शिक्षणपध्दती / अभ्यासक्रम आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांसाठी लागु करावी लागेल. एकाच शाळेतील काही विद्यार्थ्यांना सदर वर्गांना सेमी इंग्रजी व काही विद्यार्थ्यांना पुर्विप्रमाणेच मराठी माध्यम असे दोन पर्याय स्विकारता येणार नाही.

VI. सेमी इंग्रजी अध्यापन पद्धती स्वीकारल्यामुळे शाळेच्या आस्थापनेवर मान्यताप्राप्त एकही शिक्षक अतिरिक्त किंवा अर्धवेळ होणार नाही.

VII. सेमी इंग्रजी अध्यापन पध्दतीत गणित व विज्ञान विषय वगळून अन्य विषयांसाठी ही सवलत मिळणार नाही.

VIII. ज्या संस्थांना वरीलप्रमाणे इयत्ता ५ वी ते १० वीच्या वर्गांना गणित व विज्ञान विषयाचे अध्यापन इंग्रजी माध्यमातून करण्यास मान्यता दिली याचा अर्थ सेमी इंग्रजी माध्यमाच्या समांतर वर्गांना / तुकड्यांना मान्यता/परवानगी देण्यात आली आहे, असे समजण्यात येवू नये. अशाप्रकारे कोणीही

याबबाबतचा गैरफायदा घेतल्याचे निदर्शनास आल्यास अशा संस्था नियमानुसार प्रशासकीय कार्यवाहीस पात्र ठरतील.

IX. ज्या संस्थांना ऐच्छिक स्वरुपात गणित व विज्ञान हे विषय शिकविण्यास मान्यता देण्यात येईल अशा संस्थांना महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे यांनी सेमी इंग्रजी माध्यमासाठी मान्य केलेल्या अभ्यासक्रमावर आधारित शिक्षण साहित्य व पाठ्यपुस्तके महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, (बालभारती) पुणे यांचेद्वारे इयत्तानिहाय प्रकाशित पाठ्यपुस्तके लागु राहतील.

२. ज्या शैक्षणिक वर्षापासून वरील अभ्यासक्रम शिकविण्यास सुरवात करावयाची आहे, अशा संस्थांना आगामी शैक्षणिक वर्षापूर्वीच्या माहे डिसेंबर अखेर पर्यंत पाठ्यपुस्तके व शिक्षण साहित्य उपलब्धतेसाठी महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, (बालभारती) पुणे यांचेकडे संबंधित विषयाच्या सेमी इंग्रजी माध्यमाची पाठ्यपुस्तके व शैक्षणिक साहित्यासाठी मागणी नोंदविणे अनिवार्य राहील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८१२१७३२३९७९३४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

KAILAS TARACHAND SALUNKE

Digitally signed by KAILAS TARACHAND SALUNKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=2251a03d4696f35feb94e0a8547536fa68882bdecaaba93cee29502d225f6286, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=35C845457FD4B891124529DBD2192A0E21273AD7339A5CA3B170A0E91352CED7, cn=KAILAS TARACHAND SALUNKE
Date: 2024.08.12 17:47:32 +05'30'

**(कैलास साळुंके)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, राजभवन, मुंबई यांचे सचिव
२. मा विरोधी पक्षनेता (विधानपरिषद/विधानसभा), यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई.
३. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव
४. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
५. मा.उपमुख्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव.
६. मा.उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव.
७. मा. मंत्री (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे खाजगी सचिव.
८. संचालक, महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, (बालभारती) पुणे
९. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. प्रादेशिक उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक) विभाग (सर्व).
११. सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण (सर्व).
१२. उप सचिव (विजाभज-१/२/३/४/५), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. कक्ष अधिकारी ( विजाभज-१/२/३/४/५), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. निवडनस्ती (विजाभज-१)